**संसदीय कार्य विभागाच्या आस्थापनेवरील ०६ अस्थायी पदे दिनांक ३१ ऑगस्ट, २०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-आस्थापना-०४२२/प्र.क्र.१७७/पाच**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ मार्च, २०२५.

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दि.११ फेब्रुवारी, २०१६
२) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग क्र.आस्था-२०१६/प्र.क्र.२७/पाच, दि.०६ एप्रिल, २०२२
३) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग क्र.आस्थापना-०४२२/प्र.क्र.१७२/पाच, दि.१६ सप्टेंबर, २०२२
४) शासन निर्णय, संसदीय कार्य विभाग क्र.आस्थापना-०४२२/प्र.क्र.१७७/पाच, दि.१२ सप्टेंबर, २०२४
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०६ मार्च, २०२५

**शासन निर्णय:-**

संसदीय कार्य विभागाच्या आस्थापनेवरील खाली नमूद केलेल्या एकूण ०६ अस्थायी पदांना संदर्भाधीन (४) येथील दिनांक १२ सप्टेंबर, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक २८ फेब्रुवारी, २०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | वेतनश्रेणी (रुपये) |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | कक्ष अधिकारी | ०१ | एस-१७ : ४७६००-१५११००<br>एस-२० : ५६१००-१७७५०० |
| २ | सहायक कक्ष अधिकारी | ०२ | एस-१४ : ३८६००-१२२८०० |
| ३ | लिपिक-टंकलेखक | ०३ | एस-६ : १९९००-६३२०० |
| | **एकूण** | **०६** | |

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन (५) येथील दिनांक ०३ मार्च, २०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या अधिकारानुसार, **संसदीय कार्य विभागाच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या**

**पूर्वपृष्ठावर नमूद केलेल्या या विभागाच्या आस्थापनेवरील ०६ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२५ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२५ या कालावधीसाठी याद्वारे मुदतवाढ देण्यांत येत आहे**.

३. उपरोक्त पदांवर होणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्रमांक पी-१, अंतर्गत असलेल्या क्रमांक २०५२, सेक्रेटरिएट - सर्वसाधारण सेवा, ०९०, सचिवालय (००) (००) (०१) संसदीय कार्य विभाग (संगणक संकेतांक २०५२०२६८) -०१ वेतन" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सदर लेखाशिर्षाखालील सन २०२५-२६ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३ मार्च, २०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२५०३१७११०४५१८२१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यांत येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

ANIL SURESH SONAR

Digitally signed by ANIL SURESH SONAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PARLIAMENTARY AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=67ab6f3b9f65515534c678f9e5c1f62d9d1bf165ad93cc04ec6d3ac17d487aee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D5E72DDA73CE0D3887156E8C25383A5AA801357D7AE9ABD156F2A27CBA78E15E, cn=ANIL SURESH SONAR
Date: 2025.03.17 11:05:51 +05'30'

**(अ. सु. सोनार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) मुंबई,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई,
५) आहरण व संवितरण अधिकारी, रोखशाखा (२ प्रतीसह), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) सामान्य प्रशासन विभाग, कार्या.१४, १४-अ.
७) वित्त विभाग, व्यय-४, अर्थसंकल्प १८, वित्तीय सुधारणा-१ व आ.पु.क., मंत्रालय, मुंबई,
८) सर्व कक्ष अधिकारी, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) निवड नस्ती.